मोटार परिवहन विभागातील तांत्रिक पर्यवेक्षण आणि प्रशासकीय नियंत्रणासाठी निर्माण केलेल्या तांत्रिक अधिकाऱ्यांच्या ६२ अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२३ ते दि.३१.०८.२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत.

**महाराष्ट्रशासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र. एमआयएस -१३२२/ प्र.क्र.३०८/ पोल-४**
दुसरा मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक: २४ फेब्रुवारी, २०२३.

**संदर्भ**:- १) गृहविभाग, शासन निर्णय,क्र.एमआयएस-१३२२/प्र.क्र.३०८/पोल-४,दि.१६.०९.२०२२
२) अपर पोलीस महासंचालक (नि.व स.), यांचे पत्र क्र.पोमसं/२६-ब/तांत्रिक अधिकारी/ मु. प/६१/२०१२,दि.०९.०२.२०२३ चे पत्र.
३) वित्त विभाग,शासन निर्णयक्र.पदनि-२०१६/प्र.क्र.०८/१६/आ.पु.क.,दि.०८.०२.२०२३.

**शासन निर्णय** :-

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अधिपत्याखालील मोटार परिवहन विभागातील तांत्रिक पर्यवेक्षण व प्रशासकीय नियंत्रणासाठी निर्माण केलेल्या तांत्रिक अधिकाऱ्यांच्या ६२ अस्थायी पदांना संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये दि.०१.०९.२०२२ ते दि.२८.०२.२०२३ पर्यंतच्या कालावधीसाठी वित्त विभागाच्या अटींच्या अधिन राहून मुदतवाढ देण्यात आलेली आहे. वित्त विभागाच्या उपरोक्त नमूद संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२३ ते दि.३१.०८.२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेले आहेत. संदर्भ क्र. २ येथील पत्रान्वये अपर पोलीस महानिरीक्षक (नि.व स.),महाराष्ट्र राज्य,मुंबई यांनी त्यांच्या अधिपत्याखालील मोटार परिवहन विभागातील तांत्रिक पर्यवेक्षण व प्रशासकीय नियंत्रणासाठी निर्माण केलेल्या तांत्रिक अधिकाऱ्यांच्या ६२ अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२३ पासून पुढील कालावधीसाठी मुदतवाढ मिळणेबाबतचा प्रस्ताव शासन मान्यतेसाठी सादर केलेला आहे. त्यानुसार, सोबत जोडलेल्या विवरणपत्रात नमूद केलेल्या मोटार परिवहन विभागाच्या कार्यालयातील एकूण ६२ अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२३ ते दि.३१.०८.२०२३ पर्यंत खालील अटींच्या अधीन राहून मुदतवाढ देण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

१) प्रस्तावित करण्यात आलेल्या पदांपैकी कोणतेही पद सहा महिन्यांपेक्षा जास्त काळ रिक्त नाही व अस्थायी पदे ज्या कारणासाठी, अटी व शर्तीच्या अधीन राहून मंजूर केलेली आहेत त्यांचे पालन करण्यात आले आहे.
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/ प्र.क्र.८/ १६/ आ.पु.क., दि. ०८.०२.२०२३ नुसार विहित केलेल्या अटींचे व शर्तींचे कटाक्षाने पालन करण्यात येईल व त्याप्रमाणे कार्यवाही करण्यात येईल.

३) दरम्यानच्या काळात अस्थायी पदांच्या सुधारीत आकृतीबंध निश्चिती करण्याकरीता कालावधी वाढवून देण्यात येणार नाही. तसेच, सुधारीत आकृतीबंधाचा प्रस्ताव तातडीने वित्त विभागास सादर करण्याचे नियोजन करुन त्वरीत कार्यवाही करण्याच्या सूचना संबंधितांना द्याव्यात. त्यामुळे अधिकारी/कर्मचारी यांच्या वेतन व भत्यांचा प्रश्न निर्माण झाल्यास ती जबाबदारी पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांची राहील.

२. यासाठी होणारा खर्च गृह विभाग, मागणी क्रमांक : बी-१ "२०५५-पोलीस-१०८-राज्य पोलीस मुख्यालय (०२) शहर पोलीस (०२) (०१) आस्थापना" या लेखाशीर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय वित्त विभाग क्र.पदनि-२०१६/ प्र.क्र.८/ १६/ आ.पु.क., दि.०८.०२.२०२३ अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०२२४१९५०५१२४२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

YOGESH MAHADEO GOSAVI

Digitally signed by YOGESH MAHADEO GOSAVI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=409605c5c875f777d39cbf4ca29ce3d56c5c1d7c1ea54667614a049c47985d83, pseudonym=62D617A4D7B024F9E251D4AEEDB670FC8D126498, serialNumber=D910025DFF598286A45B3B22318E6C113E071B7C6E85F3D06BECDD5995FC1966, cn=YOGESH MAHADEO GOSAVI
Date: 2023.02.27 18:35:46 +05'30'

**( योगेश गोसावी )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य,मुंबई.
२. विशेष पोलीस महानिरिक्षक, मोटार परिवहन विभाग, म. रा. पुणे.
३. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
४. पोलीस उपायुक्त, मोटार परिवहन, मुंबई
५. महालेखापाल,महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई १ /नागपूर २.
६. अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
९. वित्त विभाग (व्यय-७/वित्तीय सुधारणा-१),मंत्रालय, मुंबई.
१०.अवर सचिव/कार्यासन अधिकारी (पोल-१/ पोल-१३अ/ पोल-३/ पोल-५अ/ पोल-५ब), गृहविभाग, मंत्रालय, मुंबई.
११.निवडनस्ती/गृह विभाग (पोल-४).

गृह विभाग शासन निर्णय क्र. एमआयएस -१३२२/प्र.क्र.३०८/पोल-४, दि. २४.०२.२०२३ सोबतचे विवरणपत्र

महानिरिक्षक, मोटार परिवहन विभाग, महाराष्ट्र राज्य पुणे यांच्या आस्थापनेवरील ६२ अस्थायी पदांच्या मुदतवाढीबाबत.

| अ. क्र. | प्रस्तावित पदांचे पदनाम | पदसंख्या | पद निर्मितीचा शासन निर्णय क्र. दिनांक | मागील मुदतवाढीचा शासन निर्णय क्रमांक व दिनांक |
|---|---|---|---|---|
| १ | पोलीस उपमहानिरिक्षक/ अपर पोलीस आयुक्त (तांत्रिक) | २ | शा.नि. क्र. एमटीएस ०३११/प्र. क्र. ५१३/ पोल-४,दि. ०२.०५.२०१२ | **गृह विभाग शासन निर्णय क्र. एमआयएस -१३२२/प्र.क्र.३०८/पोल-४, दि.१६.०९.२०२२.** |
| २ | अपर पोलीस अधिक्षक (तांत्रिक) | ४ | | |
| ३ | पोलीस उपअधीक्षक (तांत्रिक)/ सहायक पोलीस आयुक्त (तांत्रिक) | ६ | | |
| ४ | पोलीस निरिक्षक (तांत्रिक) | २० | | |
| ५ | पोलीस उप निरिक्षक (तांत्रिक) | ३० | | |
| | **एकूण** | **६२** | | |